अहमदनगर जिल्ह्यातील को.प. बंधाऱ्यांचे नादुरुस्त झालेले बर्गे काढून नवीन बर्गे बसविणेसाठीच्या अंदाजपत्रकास ४७०२ विस्तार व सुधारणा या लेखाशीर्षाखाली प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत. (प्रवरा उपखोरे- प्रवरा नदीवरील १९ को.प. बंधाऱ्यांच्या विशेष दुरुस्तीचे काम)

महाराष्ट्र शासन

जलसंपदा विभाग,

शासन निर्णय क्रमांक: प्रमाप्र-२०१७/ (प्र.क्र. २९१ /२०१७)/ सिं.व्य.(कामे)

मंत्रालय, मुंबई ४०००३२,

दिनांक: ३१ /०७ /२०१७

वाचा :- १. कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांचे क्र. गोमपाविम/तां-५/४५१५, दि.०८.०६.२०१७

२. शासन निर्णय संकीर्ण २०१६/(२७/२०१६)/लपा-२, दि.२६.०५.२०१७.

प्रस्तावना :-

प्रवरा व तिच्या उपनद्यांवर १९ को.प. बंधाऱ्यांवरीलस लोखंडी फळ्या (बर्गे) गेल्या २५ ते ३० वर्षापासून वापरात आहे. या को.प.बंधाऱ्यात पूर्ण संचय पातळीपर्यंत पाणी साठा होण्यासाठी एकूण ६३८९ इतक्या फळ्या आवश्यक आहेत. सद्यस्थितीत फक्त २२१६ फळ्या चांगल्या स्थितीत असून ४१७३ इतक्या फळ्या अत्यंत खराब झाला असल्याने पाणी साठा करण्याच्या दृष्टीने खूप अडचणी येतात. या १९ को.प. बंधाऱ्यात पूर्ण संचय पातळीपर्यंत पाणी साठा झाल्यास १९०० हे. सिंचन क्षेत्रात वाढ होऊन राष्ट्रीय उत्पन्नात वाढ होणार आहे. त्यामुळे नवीन बर्गे खरेदीचा प्रस्ताव सादर करण्यात आलेला असून त्यासाठी आगामी हंगामात को.प. बंधाऱ्यांमध्ये पूर्ण संच पातळीला पाणी साठा करण्याच्या दृष्टीने नवीन बर्गे मिळणे अत्यंत आवश्यक आहे. याअनुषंगाने संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये विभागास देण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन सदर दुरूस्तीच्या कामाकरीता विशेष दुरूस्ती प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

अहमदनगर जिल्ह्यातील प्रवरा उपखोरे - प्रवरा नदीवरील १९ को.प. बंधाऱ्यांचे नादुरुस्त झालेले बर्गे काढून नवीन बर्गे बसविणेसाठीच्या विशेष दुरूस्ती अंतर्गत संदर्भ क्र. १ येथील पत्रान्वये प्रस्तावित कामांच्या **रू. ३,५७,७०,९५६./-** व अनुषंगिक खर्च रू. निरंक/- अशा एकूण **रू. ३,५७,७०,९५६./-** (रू.तीन कोटी, सत्तावन्न लक्ष, सत्तर हजार, नऊशे छप्पन्न फक्त) एवढया खर्चाच्या प्रस्तावास संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये विभागास दिलेल्या अधिकारान्वये व आंतरवित्त सल्लागार तथा उप सचिव यांच्या सहमतीने खालील अटींच्या अधीन राहून सोबतच्या प्रपत्रानुसार प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. शासन परिपत्रक क्र.प्रमा-२०१३/(७८५/१३)/सिं.व्य.(कामे), दि.१.०१.२०१५ मधील मार्गदर्शक सूचनानुसार अभिलेखे ठेवणे व कार्यवाही करणे बंधनकारक आहे.
२. सदरचे कामे हे यांत्रिकी संघटने मार्फत करण्यात यावे.
३. प्रकल्पा वरील पाणी वापर संस्थेकडे संपूर्ण लाभक्षेत्र हस्तांतरणाचे नियोजन काम सुरु करण्यापूर्वी करावे; कामे पूर्ण झाल्यानंतर लाभक्षेत्र पाणी वापर संस्थेस हस्तांतरण करावे.
४. अंदाजपत्रकात गृहीत धरलेले आराखडे /संकल्पने , दरसूचीबाहय बाबी व वहन अंतरे सक्षम स्तरावर तपासून अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता प्रदान करावी.
५. कामाचा खर्च उपलब्ध अनुदानातून प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व नियोजित वेळेत पूर्ण करण्यात यावा.
६. सदरच्या कामांचा कार्यारंभ आदेश काढण्यापासून कामे पूर्ण होईपर्यंत त्रैमासिक प्रगती अहवाल शासनास सादर करावा. काम पूर्ण झाल्यानंतर त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास त्वरीत उपलब्ध करून द्यावे.

प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च ४७०२ मोठे व मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, (१०) उर्वरित महाराष्ट्र, (१०) (०४) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (४७०२ ७४८१) या लेखाशीर्षाखाली करावा व मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिं.व्य.(कामे), कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र. २५ सन २०१७-१८ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०७३११६४३०९०१२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Namita Gaurav Baser

Digitally signed by Namita Gaurav Baser
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8ee2809da7de03ff444cfa186d623a75fac5db94fb5c9de45f8a05b5f4b6fb7f, cn=Namita Gaurav Baser
Date: 2017.07.31 16:50:41 +05'30'

**(न.गौ .बसेर)**
**शासनाच्या अवर सचिव**

सोबत :- परिशिष्ट-अ, ब

**प्रत :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे कार्यालय,
३) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई
४) मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई,

५) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय,विधानभवन, मुंबई,
६) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद ,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई,
७) मा.मंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई,
८) मा. राज्यमंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
९) प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई,
१०) सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
११) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई,
१२) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर,
१३) कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद,
१४) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, नाशिक,
१५) आंतरवित्त सल्लागार व उपसचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई,
१६) अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नाशिक,
१७) कार्यकारी अभियंता, अहमदनगर पाटबंधारे विभाग, अहमदनगर,,
१८) सिं.व्य.(कामे) कार्यासन संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक: प्रमाप्र-२०१७/ (प्र.क्र. २९१ /२०१७)/ सिं.व्य.(कामे), दि. ३१ /०७/२०१७ चे सहपत्र

## परिशिष्ट -अ

| Sr.No. | Description of work | Adm. Amount |
|---|---|---|
| 1 | Manufacturing with QAP & Fabrication of KT weir Needle gate Straight Type size 2.15 X 0.50M (94 Kg wt) as per relevant Indian Standards with all , material, Mild steel confirming to IS 2062, Rubber seal confirming to IS 4623 & Welding electrodes AWS E6013 for general weld Joints. It includes all material , labour Charges, machinery charges, 1 KM lead charges of Gate parts at site , Inspection a& Quality Control charges, sand blasting, Painting with one coat of Zinc rich primer containing not less than 90% of zinc on dry film to give total dry film thickness 70+/- 5 microns and 2 coats of sloventless coal tar epoxy paint applied to give minimum dry film thickness of 150+/- micron per coat as per IS 14177, overhead charges of 10% and all incidental charges , including all duties, taxes, levies and insurance. | **3,57,70,956./-** |
| | **Total Cost** | **3,57,70,956./-** |

Namita Gaurav Baser

Digitally signed by Namita Gaurav Baser
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8ee2809da7de03ff444cfa186d623a75fac5db94fb5c9de45f8a05b5f4b6fb7f, cn=Namita Gaurav Baser
Date: 2017.07.31 16:50:53 +05'30'

(न.गौ .बसेर)
शासनाच्या अवर सचिव

## परिशिष्ट ब

(रु.लक्ष)

| अ.क्र. | को.प.बंधाऱ्याचे नांव | विभाग | नदीचे नाव | को.प.बंधाऱ्यास नादुरुस्त गेटस | दुरुस्तीसाठी आवश्यक निधी |
|---|---|---|---|---|---|
| १ | आश्वी को प बंधारा (प्रवरा Lion) | अपावि | प्रवरा | २१९ | १८.७७ |
| २ | भेर्डापूर कोप बंधारा | अपावि | प्रवरा | २३० | १९.७२ |
| ३ | चणेगाव कोपबंधारा | अपावि | प्रवरा | १८४ | १५.७७ |
| ४ | गळनिंब कोपबंधारा (प्रवरा Lion) | अपावि | प्रवरा | १५५ | १३.२९ |
| ५ | मांडवे पारनेर कोपबंधारा | अपावि | प्रवरा | २३५ | २०.१४ |
| ६ | कमालपूर कोपबंधारा (प्रवरा river) | अपावि | प्रवरा | ३५३ | २०.२६ |
| ७ | केसापूर कोपबंधारा | अपावि | प्रवरा | १३९ | ११.९२ |
| ८ | खानापूर कोपबंधारा | अपावि | प्रवरा | ३४५ | २९.५७ |
| ९ | मध्यमेश्वर प्रवरा कोपबंधारा | अपावि | प्रवरा | ४९८ | ४२.६९ |
| १० | मालुंजे कोपबंधारा | अपावि | प्रवरा | १८६ | १५.९४ |
| ११ | मांडवे कोपबंधारा | अपावि | प्रवरा | ११८ | १०.११ |
| १२ | नांदूर खंदरमाळ कोपबंधारा | अपावि | प्रवरा | १६९ | १४.४९ |
| १३ | पचेगाव कोपबंधारा | अपावि | प्रवरा | ५७५ | **४९.२९** |
| १४ | पढेगाव कोपबंधारा | अपावि | प्रवरा | ११७ | १०.०३ |
| १५ | पुनतगाव कोपबंधारा | अपावि | प्रवरा | ० | ० |
| १६ | रामपूर कोप बंधारा | अपावि | प्रवरा | २०१ | १७.२३ |
| १७ | वळदगाव कोपबंधारा | अपावि | प्रवरा | २०७ | १७.७४ |
| १८ | वांगी कोपबंधारा | अपावि | प्रवरा | ११५ | ९.८६ |
| १९ | देहरे कोपबंधारा | अपावि | प्रवरा | १२७ | १०.८९ |
| | | | | **४१७३** | **३५७.७०** |

Namita Gaurav Baser

Digitally signed by Namita Gaurav Baser
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8ee2809da7de03ff444cfa186d623a75fac5db94fb5c9de45f8a05b5f4b6fb7f, cn=Namita Gaurav Baser
Date: 2017.07.31 16:51:04 +05'30'

**(न.गौ.बसेर)**
शासनाच्या अवर सचिव